**समाजकार्य, ध्येयवादी तरुण व समाज**
*(दैनिक " देशदूत " (नाशिक) च्या दिवाळी अंका (१९७०) वरून.)*
वसंत पळशीकर

'तुम्ही काय करता?' असा प्रश्न लोक मला विचारतात तेव्हा 'समाजकार्य करतो' असे उत्तर देणे सगळ्यात सोयीचे वाटते. त्याच वेळी, या उत्तराने स्वतःचेही पुरते समाधान होत नाही हेही लक्षात येते.

एका अर्थाने, समाजाच्या धारणेस विधायक हातभार लावणारे कार्य करणारा प्रत्येकजण समाजकार्य करीत असतो. त्यासाठी त्याला वेतन मिळत असले तरी त्या कामाच्या ' समाज- कार्यपणा'त फरक पडत नाही. आणि म्हणून 'मी सामाजिक कार्यकर्ता आहे' असे सांगण्यात इतरांना हीन लेखण्याचे पाप करीत असल्याची बोच लागून राहते.

ते योग्यही आहे. सामाजिक कार्यकर्त्याचे वेगळेपण आणखी एका गोष्टीत लोक पाहतात. तो स्वतःही पाहतो. समाजातील, कोणत्याही समाजातील बहुसंख्य व्यक्ती कौटुंबिक निष्ठेने बद्ध असतात. कौटुंबिक सुख व स्वार्थ यांनी त्यांची क्षितिजे स्वाभाविक वर्तनामुळे समाजजीवन साचेबंद बनते. परिवर्तनास बंदिस्त असतात. हे असे असणेच स्वाभाविक आहे. पण त्या प्रतिकूल बनते. समाजपरिवर्तन घडवून आणण्यासाठी प्रयत्नशील असणाऱ्या सर्व क्षेत्रातील साधकांना कमीअधिक प्रमाणात ही कौटुंबिक चौकट खिळखिळी करून स्वतःस जास्त अवसर करून घ्यावा लागतो. समाजकार्य करणाऱ्यासही. सामाजिक कार्यकर्त्यांचे आणखी एक वैशिष्ट्य लक्षात घेण्यासारखे आहे. लोकांसाठी तो असतो अशी लोकांची भावना असते व तोही त्यात धन्यता मानतो. आणि हे देखील स्वाभाविक, इष्ट व आवश्यक आहे. कारण धंदेवाईक व्यवसायी वा तज्ज्ञ म्हणून एक विशिष्ट काम त्याने पत्करलेले नसते. तसे एकादे काम करीत आणि तरीही काही प्रकारच्या कामांचे वर्णन अन्य कोणत्या असतानाही लोकांच्या मागणीप्रमाणे व गरजेप्रमाणे इतरही प्रकारे करणेही समाधानकारक ठरत नाही.

अशा कार्यकर्त्यांचे वेगळेपण कशात असायला हवे वा आहे? भारतात जी समाजकार्याची परंपरा विकसित झाली तिच्या संदर्भात असे म्हणता येईल की, समाज जसा आहे तशा स्वरूपात त्याची धारणा होण्याच्या दृष्टीने त्याचे कार्य नसते, तर एक नवसमाज निर्माण करणे हा त्याच्या कामाचा एक आवश्यक पैलू असतो; ती दृष्टी ठेवून तो हातातले विशिष्ट काम करीत असतो. ‘हा समाजकार्य करणारा आहे' असे दुसऱ्या व्यक्ती बद्दल आपल्या मनात कधी येते? अशी व्यक्ती 'करिअर'च्या मागे नसते; अधिकारपद, बढती, पगारवाढ यांच्यामागे लागलेली नसते, असे एक आपल्या मनात असते. ( समाजकार्यात गढलेल्या व त्या ओघात संस्थांचे जाळे उभारलेल्या काही व्यक्तींच्या ठिकाणी समाजकार्यचेच करिअर करण्याची वृत्ती आढळते. अशा व्यक्तींची अमर्याद अधिकारलालसा, त्यांचा खूप मोठा डामडौल, त्यांचे अनधिकृत, पडद्याआडचे उत्पन्न इत्यादि गोष्टी आता समाजाच्या अनुभवास आल्या आहेत आणि या भ्रष्टते- मुळे 'समाज- कार्य ' हा एक उपहासाचा विषयही झाला आहे.) हे लक्षात घेतल्यावरही, सामाजिक कार्यकर्त्याच्या वैशिष्ट्यांचा विचार करताना करिअरचा त्याग, अधिकारपदे-बढती - पगारवाढ यापासून अलिप्तता विचारात घ्यावी लागते. सामाजिक कार्यकर्ता हा त्यागी असावा अशी एक स्वाभाविक अपेक्षा माणसे करतात व कामांची जबाबदारी तो स्वतःवर घेतो. तशी तो घेणार नाही तर लोकही त्याला सामाजिक कार्यकर्ता मानणार नाहीत.

अशा प्रकारचा सामाजिक कार्यकर्ता होण्यास कोणाची तयारी होईल? उत्कट ध्येयवाद ही त्यासाठी एक प्राथमिक आवश्यकता आहे हे न सांगताही समजण्यासारखे आहे. असा उत्कट ध्येयवाद तरुण वयात वाटावा हे तितकेच स्वाभाविक आहे. ज्या वयात ध्येयवादाचे भरते येते त्या वयात तो तरुण कोणत्या तरी क्षेत्रात वा विद्येत तज्ज्ञ वा पारंगत झालेला असेल हे आजच्या दीर्घ शिक्षणाच्या काळात अशक्यप्राय आहे. उलटपक्षी अभ्यासक्रम पुरा करण्याइतका जो तरुण शिक्षण- व्यवस्थेत टिकून राहतो त्याचा ध्येयवाद कोळपण्याची शक्यता अधिक, व तसा तो ओसरावा असे त्याच्या घरच्यांना (व दारच्यांनाही ) वाटत असल्याने ते सर्वतोपरी तसा प्रयत्न करीत असतात. कुटुंबियांकडून होणाऱ्या सर्व प्रयत्नांना व समाजातील थंडपणाला पुरून उरणारा, आणि दीर्घ काळ शिक्षण घेण्यात काळ घालवूनही आपला ध्येयवाद टिकवून ठेवणारा तरुण विरळा असावा यात आश्चर्य ते काय?

'देशदूत' च्या संपादकांनी जो प्रश्न उपस्थित केला आहे- जो जास्त उत्साह दाखवितो तो हे कार्य करू शकतो का? - तो कसा चुकीचा आहे हे आता लक्षात येईल. उत्साह व ध्येयवाद याशिवाय समाजकार्याकडे माणूस वळणार नाही. प्रश्न विचारायला हवा तो असा की, 'तरुणांच्या ध्येयवादाला व उत्साहाला योग्य त्या कौशल्याची, प्राविण्याची जोड कशी मिळेल, व आज ती तशी का मिळत नाही?’

पण हा प्रश्न त्यांनी विचारला नाही. कारण तेही आजच्या प्रचलित दृष्टिकोनाचे प्रतिनिधित्व करीत असावेत असे वाटते. आजच्या सामाजिक अवस्थेत समाजकार्यासाठी असंख्य भार तीय तरुणांनी बाहेर पडण्याची आवश्यकता त्यांना जाणवली असती तर जे काही थोडे तरुण उत्साह व ध्येयवाद यामुळे चाकोरीबाहेर पडण्याचे धैर्य दाखवीत आहेत त्यांच्या उत्साहा- बद्दल असा अश्रद्धेचा भाव त्यांच्या प्रश्नपत्रिकेतून उमटला नसता. उलट, तरुणांच्या उत्साहावर व ध्येयवादावर सिनि- सिझमचे, स्वार्थी कौटुंबिक निष्ठेचे दडपण आणून त्यांना 'संसारा ' ला लावू पहाणाऱ्या या समाजमानसात कसे परि- वर्तन घडवून आणावे असा प्रश्न त्यांनी केला असता.
सुरुवातीस म्हटल्याप्रमाणे, भारतात ज्याला समाजकार्य म्हणण्याचा रूढ प्रघात आहे असे कार्य मी काही वर्षे केले आहे व तसे कार्य करणाऱ्या संस्थांच्या व कार्यकर्त्यांच्या अडचणी जवळून पाहण्याचे दुर्भाग्य मला लाभले आहे. बऱ्याच प्रमाणात समाजकार्याचे संघटन करणाऱ्या व्यक्तींना व संस्थांना पुरेशी साधनसामग्री उपलब्ध करून देण्याचा प्रश्न मध्यवर्ती आहे. समाजाने या कार्याच्या संबंधातली आपली जबाबदारी बरीचशी झटकून टाकलेली आहे व सरकारच्या औदार्यावर अवलंबून राहणे भाग पाडले आहे. सरकारी नियमांच्या योजनांच्या व कार्यपद्धतीच्या चक्रव्यूहात गुरफटलेल्या समाजकार्यात भ्रष्टता न आली, त्याला अवकळा प्राप्त झाली नाही तरच नवल.
संपादकांनी एक प्रश्न शेवटी विचारला आहे : 'आजच्या समाजात विकासोन्मुख प्रेरणाच शिल्लक नाहीत का? असल्यास त्यांचे स्वार्थशून्य संकलन हेच महत्त्वाचे समाजकार्य ठरणार नाही काय?' यासाठी सर्वप्रथम दोन गोष्टी व्हायला हव्यात. एक, समाजकार्यकर्त्यांची त्यांच्या व्यक्तित्वाच्या सर्व वैशिष्ट्यपूर्ण पैलूंसह नितांत आवश्यकता लोकमानसात मुरायला हवी. म्हणजेच आपल्या मुलामुलींना करिअरच्या संसाराच्या, स्वार्थाच्या चक्रात अडकवण्याचा खटाटोप करण्यातली गर्हणीयता समाजाच्या मनावर ठसली पाहिजे. त्या जाणीवेतून वर्तनात सुधारणा व्हायला पाहिजे. तसे झाले म्हणजे ध्येयवादाची उत्कटता व उत्साह जपण्यासाठी शिक्षण सोडण्याची गरज राहणार नाही. आज शिक्षण सोडून वा त्याकडे दुर्लक्ष करून, म्हणजे ते कसेतरी पुरे करून, तरुण या क्षेत्रात येतो त्यामागं अबोध पातळीवर या दडपणाची जाणीव असते.
दुसरी गोष्ट, या कामाला कळा प्राप्त व्हायची तर समाज- कार्यकर्त्यांची व संस्थांची उपासमार करण्याचे थांबले पाहिजे. ख्रिस्ती मिशन-यांच्या कार्याचे आपण कौतुक करतो, आश्चर्य व्यक्त करतो. त्या वेळी साधनसंपत्तीचे पाठबळ उभे करण्याची जबाबदारी त्यांच्या समाजाने उचललेली आहे याकडे मात्र सोईस्करपणे आपण दुर्लक्ष करतो. मिशनरी वृत्तीने जगभर पुरुषार्थाची क्षेत्रे धुंडाळत जाणाऱ्या व्यक्तींचा सन्मान समाज करतो, ती परंपरा जिवंत राहील अशा प्रकारची प्रतिष्ठा त्या कामाला देतो हे आपण लक्षात घेत नाही.
हे बदलले पाहिजे, आणि हे तरुणांनीच बदलावयाचे आहे.